# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः झेडपीए-२०१५/प्र.क्र.१०/वित्त-९

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई ४०००३२.
तारीख: २५ मार्च, २०१५

**वाचा:-**

**१) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्रमांकःझेडपीए-२००४/प्र.क्र.१८/वित्त-९(३३), दि.३० जून, २००४.**
**२) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्रमांकःझेडपीए-२००८/प्र.क्र.४७२/वित्त-९(३३), दि.९ फेब्रुवारी, २००९.**

**प्रस्तावना:-**

ग्रामपंचायत संस्थांचे बळकटीकरण करणे तसेच ग्रामपंचायतींना आर्थिकदृष्ट्या सक्षम करणे याकरिता शासनाने मार्गदर्शक सूचना दिल्या होत्या.

सद्य:स्थितीत ग्रामपंचायत कार्यक्षेत्रामध्ये ग्रामपंचायतीमार्फत करावयाच्या कामामध्ये मोठ्या प्रमाणावर वाढ झाली आहे. महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमी योजना व केंद्रीय वित्त आयोगाद्वारे ग्रामपंचायतींना भरीव निधी प्राप्त होत आहे. तसेच जिल्हा परिषद/पंचायत समिती यांचा स्व:निधी, आमदार/खासदार स्थानिक विकास निधी या शिवाय अनुसूचित जाती/जमाती यांच्या कल्याण योजना इत्यादी विकास कामाअंतर्गत निधी ग्रामपंचायतीकडे प्राप्त होत आहे.

ग्रामपंचायतींकडे मोठ्या प्रमाणावर विकास कामे प्राप्त होत असली तरी ग्रामपंचायतींकडे पुरेसे तांत्रिक मनुष्यबळ व यंत्रसामुग्रीची उपलब्धता मर्यादीत असल्यामुळे विकास कामांचा दर्जा व काम वेळेत पूर्ण होणे यात अडचणी निर्माण होत आहेत, असे निदर्शनास आले आहे.

गावाचा सर्वागीण विकास व्हावा या दृष्टीने आमदार/खासदार स्थानिक विकास निधी तसेच इतर योजनांचा विकास निधी यामधून ग्रामपंचायत हद्दी मध्ये ग्रामपंचायती बरोबर इतर एजन्सी/यंत्रणांनाचाही ग्रामपंचायतींच्या विकासामध्ये सहभाग व्हावा या दृष्टीने नवीन कार्यपध्दती अमंलात आणण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता. त्याप्रमाणे याबद्दल निर्णय घेण्यात आला असून या विषयाचे संदर्भाधीन **उपरोक्त शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून पुढील प्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत:-**

**<u>शासन निर्णय</u>:-**

ग्रामपंचायत “एजन्सी” म्हणून विकास कामे करताना खालीलप्रमाणे त्यांचे उत्पन्न असणे आवश्यक असून त्या उत्पन्नानुसार :

१) **<u>वित्तीय मर्यादा</u>** :

१.१) रु.५०,००० पर्यंत वार्षिक उत्पन्न असणाऱ्या ग्रामपंचायतींना रु.१०,००,०००/-

१.२) रु.५०,००१ च्या पुढे वार्षिक उत्पन्न असणाऱ्या ग्रामपंचायतींना रु.१५,००,०००/- पर्यंतच्या रक्कमेची कामे करता येतील.

२) **<u>ग्रामपंचायतींनी करावयाची कामे</u> :**

२.१) जी कामे ग्रामपंचायतींनीच कायद्याप्रमाणे करणे बंधनकारक आहे ती कामे (उदा. MGNREGA -खाली किमान ५०% काम),

२.२) ग्रामपंचायतींना प्राप्त होणाऱ्या केंद्रिय वित्त आयोगाचा निधीतील कामे.

२.३) जी कामे ग्राम पंचायतीनीच करावीत असे केंद्र शासनाच्या योजनेमध्ये अंतर्भूत असतील अशी कामे.

२.४) तसेच त्यांच्या स्व:निधीतील कामे ग्रामपंचायती मार्फतच केली जातील.

**३)** याशिवाय, अन्य जी कामे ग्रामपंचायत मार्फत ग्रामपंचायत प्रत्यक्ष काम करणारी “एजन्सी” म्हणून कार्यान्वित असतील अशी कामे उपरोक्त १ येथील मर्यादेपर्यंत वार्षिक उत्पन्न असणाऱ्या ग्रामपंचायतींना खालील अटींच्या अधीन राहून करता येतील.

३.१) ग्रामपंचायतींनी त्यांच्या गावठाण्याच्या हद्दीतील मुलभूत सुविधेची कामे/विकास कामे करावीत.

३.२) गावाशी निगडीत असलेली कामे उदा.शाळा-इमारत, समाज मंदिर, प्राथमिक आरोग्य केंद्रे व उपकेंद्र यासारखी कामे गावठाण्याच्या हद्दी बाहेर असली तरी ग्रामपंचायतींना करता येतील.

**४)** सामान्य प्रशासन विभागाकडील (माहिती व तंत्रज्ञान) शासन निर्णय क्र.मातंसं/नस्ती-२०१२/प्र.क्र.२७३/३९, दि. २६ नोव्हेंबर, २०१४ व सामान्य प्रशासन विभागाकडील (माहिती व तंत्रज्ञान) शासन निर्णय क्र.मातंसं/नस्ती-२०१२/प्र.क्र.२७३/का.३९, दिनांक १८ डिसेंबर, २०१४ नुसार रु. ३ लक्ष पेक्षा अधिक रक्कमेच्या विकास कामांच्या निविदे करता ई-निविदा पध्दतीचाच अवलंब करणे अनिवार्य आहे.

५) **<u>इतर मार्गदर्शक सूचना</u>** :

५.१) ग्रामपंचायतीं मार्फत करावयांच्या कामांना सक्षम प्राधिकारी यांची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

५.२) या कामांची तांत्रिक तपासणी,कामाची मोजमापे, अभिलेख्यांची नोंदणी अशी अनुषंगिक कामे जिल्हा परिषद/पंचायत समितीचे शाखा अभियंता/उप अभियंता/ कार्यकारी अभियंता हे पाहतील.

५.३) ग्रामपंचायत पुढील ग्रामसभेमध्ये ग्रामपंचायतींनी केलेल्या कामांची संपूर्ण माहिती सादर करेल.

६) **इतर एजन्सी/यंत्रणेचे अधिकार व जबाबदारी :**

६.१) वेगवेगळ्या योजनांमधून ग्रामपंचायत क्षेत्रात कार्यान्वयीत करण्यात यावयाची अन्य सर्व कामे संबंधित प्रशासकिय विभाग ज्या कार्यान्वयीन एजन्सी/यंत्रणेमार्फत करुन घेऊ इच्छितो त्या कार्यान्वयीन एजन्सी/यंत्रणेमार्फत करु शकतील.

६.२) तथापि, लोकप्रतिनीधी स्थानिक विकास कार्यक्रम तसेच विविध प्रकल्पातून किंवा शासनाच्या विविध योजनेतून ग्रामपंचायत हद्दीमध्ये इतर एजन्सी/यंत्रणामार्फत करण्यात येणाऱ्या विकास कामांची माहिती ग्रामपंचायतीस अवगत करणे संबंधित यंत्रणांना बंधनकारक राहील.

या संदर्भात महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या लेखा संहिता, १९६८ मध्ये योग्य ती दुरुस्ती यथावकाश करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२६१२३६२७४५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

V Giriraj

Digitally signed by V Giriraj
DN: c=IN, o=All India Service, ou=Principal Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=V Giriraj
Date: 2015.03.27 15:22:27 +05'30'

(वि.गिरिराज)
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
४. सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
५. मा.विधान सभा/विधान परिषद सदस्य
६. महालेखाकार(स्थानिक संस्था) महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतीसह)
७. महालेखाकार(स्थानिक संस्था) महाराष्ट्र-२, नागपूर (पाच जादा प्रतीसह)
८. वित्त विभाग(व्यय-१५ व अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.

९. सर्व विभागीय आयुक्त (महसूल)

१०.मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक

११.संचालक तथा मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवी मुंबई

१२.सहसंचालक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, अमरावती.

१३.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

१४.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी

१५.सर्व जिल्हा उप मुख्य लेखापरिक्षक अधिकारी, स्थानिक निधी लेखा

१६.सर्व सहसचिव/उपसचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग

१७.सर्व कार्यासन अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग

१८.निवडनस्ती.